**चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांचे अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील २८ अस्थायी पदांना सन २०२०-२१ कालावधी करिता मुदतवाढ देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४३/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३० मार्च, २०२०

वाचा :-

१. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.५३/१९-२०/१७५२, दिनांक १८.२.२०२०
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१२७/फ-९, दि.०२.०४.२०१९
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१२७/फ-९, दि.१०.१०.२०१९
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील २८ अस्थायी पदांना सन २०१९-२० या आर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१९ पासून दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पूढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र.२ व ३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ क्र.१ अन्वये मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सन २०२०-२१ करीता प्रस्तावातील २८ अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.

संदर्भ क्र.४ येथील वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १२.०२.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही. अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना **दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० या सहा महिन्यांच्या कालावधीसाठी** मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्यानुसार चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अखत्यारीतील योजनांतर्गत योजनेतील सोबतच्या विवरणपत्रातील **२८ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या सहा महिन्याच्या कालावधीसाठी** चालू ठेवण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

या पदांवर होणारा खर्च मागणी क्रमांक-सी-७, प्रधान शिर्ष २४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण, ०६-वनीकरण, २७७-शिक्षण, (००) (०३) “चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी चंद्रपूर” (२४१५-१०७७) या लेखा शिर्षाअंतर्गत सन २०२०-२१ मध्ये मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०१६५०४६३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.30 17:13:12 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग.

**प्रति** :-

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य पुणे
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशेधन, शिक्षण व प्रशिक्षण ) महाराष्ट्र राज्य पुणे
६. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य पुणे
७. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर
८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
१०. नियोजन विभाग (कार्यासन १४५४), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११. वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/वित्तिय सुधारणा, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवडनस्ती, फ-९ कार्यासन,म. व व.वि,.मंत्रालय,मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४३/फ-९, दिनांक ३० मार्च, २०२० सोबतचे विवरणपत्र चंद्रपूर वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी यांच्या अधिपत्याखालील अस्थायी पदांची स्थिती:-**

(दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली पदे)

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | शेरा |
|---|---|---|---|
| १ | संचालक (वनसंरक्षक दर्जा) | १ | शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०१५/ प्र.क्र.४५/ फ-२, दि.१३.०२.२०१५ अन्वये |
| २ | शारीरीक शिक्षण निर्देशक | १ | |
| ३ | लिपीक | २ | |
| ४ | प्रयोगशाळा परीचर | १ | |
| ५ | शिपाई | ४ | |
| ६ | मुख्य लेखापाल | १ | |
| ७ | केअर टेकर | १ | |
| ८ | माळी | २ | |
| ९ | सफाई कामगार | २ | |
| १० | चौकीदार | १ | |
| ११ | अपर संचालक (निर्देशक) | १ | |
| | **एकूण** | **१७** | |
| १२ | उपअभियंता | १ | शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०१५/ प्र.क्र.७९/फ-२, दि.३१.०३.२०१५ अन्वये (संचालकाचे १ पद द्विरुक्ती झाल्याने कमी करण्यात आले आहे) |
| १३ | लघुलेखक उच्चश्रेणी | १ | |
| १४ | वाहन चालक | २ | |
| १५ | वनरक्षक | २ | |
| १६ | ग्रंथालय परीचर | १ | |
| | **एकुण** | **७** | |
| १७ | सहाय्यक वनसंरक्षक | ३ | शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०१४/ प्र.क्र.६२/फ-२ दि.०४.१२.२०१४ नुसार सहाय्यक वनसंरक्षक या पदाची श्रेणी अवनत करुन वनपरिक्षेत्र अधिकारी हे पद दर्शविण्यात येत आहे. |
| १८ | वनपरिक्षेत्र अधिकारी | १ | |
| | एकुण | ४ | |
| | एकुण पदे १७+७+४ | **२८** | |

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.30 17:13:41 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**